सन २०१५-१६ मध्ये राज्यातील टंचाई घोषित केलेल्या भागांमध्ये सुरू करण्यात आलेल्या जनावरांच्या छावण्यांमध्ये दाखल होणा-या जनावरांना पशुसंवर्धन विभागामार्फत पशुवैद्यकीय सेवा निःशुल्क पुरविण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांकः व्हीएचडी-२०१५/प्र.क्र.२५२/पदुम ४
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक- २१ सप्टेंबर, २०१५

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः एससीवाय-१३-२००१/प्र.क्र.११०/म-११, दि. २.०८.२००१
२) शासन निर्णय क्रमांकः एससीवाय-२०१५/प्र.क्र.२४८/म-७, दि. २०.०८.२०१५

प्रस्तावना -

सन २०१५-१६ मध्ये राज्यातील काही भागांत कमी पर्जन्यमान झाल्याने उद्भवलेल्या टंचाई परिस्थितीच्या अनुषंगाने करावयाच्या उपाययोजनेअंतर्गत आवश्यकतेनूसार जिल्हाधिकारी यांचेमार्फत सहकारी साखर कारखाने व इतर कारखाने, सहकारी खरेदी-विक्री संघ, कृषि उत्पन्न बाजार समित्या, दूध खरेदी-विक्री संघ यासारख्या सेवाभावी संस्थांकडून जनावरांच्या छावण्या उभारण्यात आलेल्या आहेत. जनावरांच्या छावण्यांमध्ये दाखल होणाऱ्या जनावरांना पशुसंवर्धन विभागामार्फत विविध पशुवैद्यकीय सेवा पुरविण्यात येतात. या पशुवैद्यकीय सेवा निःशुल्क पुरविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने, खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

शासन निर्णय-

सन २०१५-१६ मध्ये महसूल व वन विभागाकडून टंचाई घोषित केलेल्या भागांमध्ये उघडण्यात आलेल्या/ येणाऱ्या जनावरांच्या छावण्यांमध्ये दाखल झालेल्या / होणाऱ्या जनावरांना पशुसंवर्धन विभागामार्फत पुरविण्यात येणाऱ्या विविध पशुवैद्यकीय सेवा जसे की, रोगप्रतिबंधक लसीकरण, पशुरुग्णांवर उपचार, जंतनाशके पाजणे, लहान व मोठया शस्त्रक्रिया, खच्चीकरण, कृत्रिम रेतन, गर्भ तपासणी, वंध्यत्त्व तपासणी, इत्यादी सेवा टंचाई परिस्थिती संपुष्टात आल्याचे महसूल व वन विभागाकडून जाहिर करण्यात येईपर्यंत निःशुल्क उपलब्ध करुन देण्यात याव्यात.

सदर आदेशाची अंमलबजावणी हा शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून करण्यात यावी .

हा शासन निर्णय महसूल व वन विभागाच्या सहमतीने तसेच, वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र. ३७४/१५/व्यय-२, दिनांक १९.०९.२०१५ अन्वये, निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९२११३१५५७१००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Machindra Apparao Pachpinde

Digitally signed by Machindra Apparao Pachpinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=a6acbdcfb816875075a31b7754a1ac8c55c206e2845f9145cd34b586d977a703, cn=Machindra Apparao Pachpinde
Date: 2015.09.21 13:22:51 +05'30'

**(डॉ.एम.ए.पाचपिंडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२) मा.मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
३) मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
४) मुख्य सचिव यांचे उपसचिव
५) सचिव, महसूल व वन (मदत व पुनर्वसन) विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
६) आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य पुणे.
७) विभागीय आयुक्त (सर्व)
८) जिल्हाधिकारी ( सर्व)
९) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१०) प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन (सर्व)
११) जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त (सर्व)
१२) जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर.
१४) वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई - ३२
१५) महसूल व वन विभाग (कार्यासन- म ७) मंत्रालय, मुंबई - ३२
१६) अवर सचिव (पदुम-३) / कक्ष अधिकारी पदुम १ / १६, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
१७) निवड नस्ती पदुम -४